**नाशिक महसुल विभागातील कृषि मालाकरिता पणन सुविधा निर्माण करणेबाबच्या मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक मकृप २००९/प्र.क्र.७२/२१-स,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०७ जुलै, २०१०

**परिपत्रक :**

नाशिक विभागातील प्रमुख फळे व भाजीपाला पिकांना व्यापारी दृष्टीकोनातून असलेले महत्व लक्षात घेऊन या पिकांकरिता प्रक्रिया व पणन विषयक सुविधा उपलब्ध करुन दिल्यास नाशिक विभागातील या पिकांची मोठया प्रमाणात स्थानिक तसेच आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत विक्री करणे शक्य व्हावे तसेच या भागातील शेतक-यांना त्यांच्या मालास अधिक उत्तम भाव मिळावा म्हणून पणन विषयक पायाभूत सुविधा निर्माण करण्याचा निर्णय राज्य शासनाने समक्रमांकाच्या दिनांक १३.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये घेतला होता. सदर पॅकेजमधील योजनांच्या अंमलबजावणीकरीता या परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**नाशिक टर्मिनल मार्केट :**

शेतकऱ्याने उत्पादित केलेल्या नाशवंत फलोत्पादनाचे नुकसान कमी करुन त्यांना जास्तीत जास्त फायदा देण्यासाठी व मध्यस्थांची साखळी कमी करण्यासाठी राज्यात मुंबई व नागपुर शहरांच्या धर्तीवर नाशिक येथे केंद्र शासनाच्या योजनेच्या माध्यमातुन हब (Hub) व स्पोक (Spoke) संकल्पनेवर आधारित सुमारे रु. ६० कोटी प्रकल्प किंमतीचे टर्मिनल मार्केट सार्वजनिक-खाजगी भागीदारीतुन उभारण्याचे प्रस्तावित असून त्याकरिता महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळास 'नोडल एजन्सी' म्हणून यापूर्वीच नियुक्त करण्यात आलेले आहे. सदर टर्मिनल मार्केटची उभारणी केंद्र शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे करण्यात येणार असून केंद्र शासनाच्या योजनेअंतर्गत सदर योजनेकरीता वित्तीय आराखडा पुढीलप्रमाणे असेल.

| अ.क्र | घटक | एकुण खर्चातील वाटा (%) | रु. कोटी |
|---|---|---|---|
| १ | केंद्र शासन | ४० | २४.०० |
| २ | खाजगी भागीदार | ६० | ३६.०० |
| | **एकुण** | **१००** | **६०.००** |
| | | | |

या योजनेअंतर्गत केंद्र शासनातर्फे खाजगी गुंतवणूकदारास प्रकल्पातील पणन विषयक पायाभूत सुविधांच्या किंमतीच्या किमान २५% व कमाल ४०% या मर्यादेपर्यंत अनुदान प्राप्त होईल.

**ब) फळे व भाजीपाल्याकरीता - शीतसाखळी स्थापन करणे-**

नाशिक विभागातील नाशवंत फळांकरीता व भाजीपाल्यांकरिता वातानुकुलित वाहन, प्रिकुलिंग, कोल्ड स्टोअरेज, रायपनिंग चेंबर इत्यादीचा आवश्यकतेप्रमाणे समावेश असलेल्या ७ शीत-साखळया स्थापन करण्यात येणार आहेत. यामध्ये शेतकरी आपला माल फार्म पॅकहाऊसला आणेल व त्या ठिकाणी त्यावर प्राथमिक प्रक्रिया व पॅकींग करुन वातानुकुलित वाहनाने माल समूह केंद्रात आणला जाईल. तदनंतर तो ग्रेडींग पॅकींग करुन प्रिकुलिंग, कोल्ड स्टोअरेजमध्ये ठेवला जाईल व नंतर निर्यात केला जाईल.

उपरोक्त सर्व ७ शीत-साखळी युनिट अपेडा अथवा स्टेट हॉर्टिकल्चर मिशन वा नॅशनल हॉर्टीकल्चर बोर्ड यांच्या प्रचलित योजनेतुन उभारण्यात येतील, त्याकरिता गुंतवणूकदारांना संबंधित संस्थेच्या प्रचलित योजनेअंतर्गत त्यांच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे प्रकल्प अहवाल सादर करावे लागतील. या पॅकेजअंतर्गत नाशिक महसुल विभागात शीत-साखळींचे ७ प्रकल्प स्थापन करण्यात येतील व याकरीता एकूण सुमारे रु. ३२.३३ कोटी खर्च अपेक्षीत आहे.

| **अ.क्र.** | **सुविधा केंद्र** | **स्थळ व जिल्हा** | **अपेक्षित खर्च (रु. लाखात)** |
|---|---|---|---|
| १ | डाळींब, कांदा निर्यात सुविधा केंद्र | कळवण, जि नाशिक | ८१० |
| २ | डाळींब निर्यात सुविधा केंद्र | मालेगाव, जि. नाशिक | ५१३ |
| ३ | फळे व भाजीपाला निर्यात सुविधा केंद्र | राहता, जि. अहमदनगर | ५०५ |
| ४ | केळी निर्यात सुविधा केंद्र | यावल, जि जळगाव | ५२० |
| ५ | डाळींब निर्यात सुविधा केंद्र | साक्री, जि धुळे | २९५ |
| ६ | केळी निर्यात सुविधा केंद्र | शहादा, जि. नंदुरबार | २९५ |
| ७ | फुले निर्यात सुविधा केंद्र | नाशिक, जि. नाशिक | २९५ |

या प्रकल्पाकरीता वित्तिय सहाय्याचा आराखडा खालील प्रमाणे अपेक्षीत आहे.

| **अ.क्र** | **घटक** | **एकुण खर्चातील वाटा (%)** | **रु. कोटी** |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासनाचे अनुदान | १५ | ४.८४८ |
| १ | पणन मंडळ | १० | ३.२३२ |
| २ | अपेडा /स्टेट हॉर्टिकल्चर मिशन | ७५ | २४.२५ |
| | **एकुण** | **१००** | **३२.३३** |

**क) फार्म पॅक-हाऊस स्थापन करणे :**

या प्रत्येक शीत साखळी प्रकल्पाभोवती ५ फार्म पॅकहाऊसेसचा समावेश असेल. प्रस्तावित ७ व सावदा येथील स्थापित १ अशा ८ समूह केंद्रासाठी अशी ४० फार्म पॅकहाऊस करण्याचे योजिले आहे. याकरीता प्रति फार्म पॅक हाउसचा खर्च रु. २५ लाख याप्रमाणे एकुण रु. १०.०० कोटी इतका खर्च अपेक्षीत आहे. याकरीता वित्तीय आराखडा खालीलप्रमाणे अपेक्षीत आहे.

| **अ.क्र** | **घटक** | **एकुण खर्चातील वाटा (%)** | **रु. कोटी** |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासन अनुदान | १५ | १.५० |
| १ | पणन मंडळ | १० | १.०० |
| २ | अपेडा /स्टेट हॉर्टिकल्चर मिशन | ७५ | ७.५० |
| | **एकुण** | **१००** | **१०.००** |

**ड) मल्टीप्रॉडक्ट प्रक्रिया प्रकल्प :**

नाशिक जिल्ह्यातील द्राक्षे, डाळींब, केळी, टोमॅटो इ. फळे व भाजिपाल्यावर प्रक्रिया करणेसाठी मल्टीप्रॉडक्ट प्रक्रिया युनिट (क्षमता - २ मे.टन /तास) स्थापन करणे प्रस्तावीत आहे. या प्रकल्पाचा अंदाजीत खर्च रु. १० कोटी अपेक्षीत आहे. नाशिक जिल्ह्यात अशा प्रकारचे २ प्रकल्प पिंपळगाव (ब) व दिंडोरी येथे प्रस्तावित असून नंदुरबार/धुळे जिल्हयातील अक्कलकुवा/धडगाव येथे चारोळी / अमसुल प्रक्रिया प्रकल्प स्थापित करणे प्रस्तावीत आहे. याकरीता एकुण रु. ३०.०० कोटी इतका खर्च अपेक्षीत आहे. सदरचे प्रक्रिया प्रकल्प सार्वजनिक-खाजगी भागीदारीतुन स्थापित करणे अपेक्षीत आहे. याचा प्रस्तावित वित्तीय सहाय्याचा आराखडा खालील प्रमाणे अपेक्षीत आहे.

| **अ.क्र** | **घटक** | **एकुण खर्चातील वाटा (%)** | **रु. कोटी** |
|---|---|---|---|
| १ | केद्र शासन-अन्न प्रक्रिया उद्योग मंत्रालय अनुदान | ५० | १५.०० |
| २ | खाजगी भागीदार | ५० | १५.०० |
| | **एकुण** | **१००** | **३०.००** |

नाशिक पॅकेज अंतर्गतच्या उपरोक्त सर्व योजनांकरिता (मल्टीप्रॉडक्ट प्रक्रिया प्रकल्प वगळून) प्राधान्याने शेतक-यांचे बचत गट, शेतकरी कुटुंब, स्वयंसहाय्यता बचत गट, शेतकरी मंडळे व सहकारी संस्थांना लाभ देण्यात यावा, तसेच ज्या योजनांकरिता पुरेसा प्रतिसाद लाभणार नाही अशा योजनांकरिता खाजगी गुंतवणूकदारांची लाभार्थी म्हणून निवड करता येईल. त्याचप्रमाणे सदरच्या सर्व योजनांमधील अपेडा, स्टेट हॉर्टीकल्चरल मिशन व केंद्रीय अन्न प्रक्रिया मंत्रालय यांच्या प्रचलित योजनांव्दारे मिळणारा वाटा सदर संस्थांच्या धोरणानुसार राहील. एखाद्या योजनेकरिता संबंधित योजनेतुन अनुदान उपलब्ध न झाल्यास गुंतवणूकदारास सदर प्रस्ताव स्टेट हॉर्टीकल्चरल मिशन अथवा नॅशनल हॉर्टीकल्चर बोर्ड यांच्याकडे अनुदानाकरिता त्यांच्या प्रचलित योजनेअंतर्गत त्या योजनांच्या मार्गदर्शक तत्वानुसार सादर करावा लागेल.

नाशिक पॅकेज अंतर्गतच्या शीत-साखळी स्थापन करणे व फार्म-पॅक हाऊस  स्थापन करणे या योजनांमधील राज्य शासनाचा वाटा लाभार्थ्यांना अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येणार आहे तसेच महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळामार्फत देण्यात येणारा वाटा हा अत्यल्प व्याजदरावरील कर्ज स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येणार असुन सदर कर्जाची परतफेड लाभार्थ्यांना पणन मंडळाच्या अटी व शर्तीनुसार करावी लागेल.

सदर पॅकेजअंतर्गतच्या शीत-साखळी स्थापन करणे व फार्म-पॅक हाऊस  स्थापन करणे या योजनेमध्ये राज्य शासनाचा सहभाग असून सदर निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५४७५ - इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च
(००)(१०२), नागरी पुरवठा
(०२) पणन करिता अर्थसहाय्य
(०२)(०१) टर्मिनल मार्केट / मॉडर्न ॲग्रो मार्केट उभारणीकरिता अंशदान

सदर शासन परिपत्रक ,महाराष्ट्र शासनाच्या वेबसाइटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१००७०७१९४०३५००१ असा  आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
(श्रीकांत चं. आंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

प्रति,
१. मा. उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (पणन) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री (पणन) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (सहकार व पणन) , मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (नियोजन) , मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (वित्त) , मंत्रालय, मुंबई
७. पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे
८. कार्यकारी संचालक, कृषि पणन मंडळ, पुणे
९.सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे

१०. महालेखापाल,महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),मुंबई
११. महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),नागपूर
१२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नाशिक विभाग, नाशिक.
१३.जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (नाशिक, अहमदनगर, धुळे, जळगांव व नंदूरबार )
१४. सहसंचालक लेखा व कोषागारे ,संगणक कक्ष,५ वा मजला,नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर,मुंबई ४०००३२
१५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१६.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१७. वित्त विभाग (व्यय-२/शासन हमी/अर्थसंकल्प-१२),मंत्रालय,मुंबई
१८. कक्ष अधिकारी १७-स,सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१९. कक्ष अधिकारी (संगणक कक्ष),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
२०. निवड नस्ती